**राज्यातील वीज उपलब्ध नसलेल्या शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्याची पोती शिवण्यासाठी लागणाऱ्या सुतळीगाठीची गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे खरेदी करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्रमांक : सामुग्री-४५२३/प्र.क्र. ७०/ ना.पु. १६ ब,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ जून, २०२३.

वाचा : शासन निर्णय समक्रमांक दि.३१ मे २०२३.

**शासन शुध्दीपत्रक :- उपरोक्त वाचा येथे नमूद केलेल्या शासन निर्णय दि.३१ मे २०२३ मधील परिच्छेदक्र.२.१,२.२ व ७.२ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.**

**अ) परिच्छेद क्र. २.१ मधील सुतळी गाठीची मानके** यामध्ये :

"भारतीय मानक संस्थेकडे सुतळीसाठी IS १९१२: १९८४ या क्रमांकाची नोंदणी आहे. या नोंदणीसाठी सुतळीच्या वेरायटीनुसार नॉर्म्स निश्चित करण्यात आले आहेत. उपरोक्त मानकांतील वेरायटी क्र.२ ची Linear Density, Number of ply Breking Load - ६८५ m/kg ३ ply; १४७ N या निकषाची ISI चिन्हांकित सुतळीची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे करण्यात यावी".

**याऐवजी**

"भारतीय मानक संस्थेकडे सुतळीसाठी नमूद चिन्हाकित आयएसआय मानके किंवा आयएसआय मार्कशी समांतर दर्जा प्राप्त मानके आवश्यक आहेत. तसेच सुतळीच्या वेरायटीनुसार निश्चित नॉर्म्सनुसार Linear Density, Number of ply Breking Load - ६८५ m/kg ३ ply; १४७ N या निकषाची सुतळीची खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलद्वारे करण्यात यावी" असे वाचण्यात यावे.

**ब) परिच्छेद क्र. २.२ मधील मुद्दयातील**

२.२ गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर उपरोक्त मानकांची ISI चिन्हांकित सुतळीचे जे पुरवठादार आहेत व त्यांची सन २०२०-२१,२०२१-२२,२०२२-२३ या **मागील लगतच्या ३ आर्थिक वर्षाची सरासरी उलाढाल ही किमान ३ कोटी रुपये आहे**, अशा पुरवठादारांकडून बोली मागविण्यासाठी ई-निविदा प्रसिध्द करावी. निविदाकारांकडून ई-निविदा (E-Bid) प्राप्त झाल्यावर सहभागी झालेल्या ग्राह्य निविदाकारांकडून ते अधिकृत पुरवठादार असल्यास त्यांना **उत्पादक कंपनीने अधिकृत वितरक** नेमल्याबाबतचे प्राधिकारपत्र, **उत्पादक ISI व ISO प्रमाणपत्र धारक असल्यास त्याची वैध प्रत**, उत्पादक निविदाकार असल्यास त्याच्या ISI **व ISO** मानकाची वैध प्रत अथवा **निविदाकार हा अधिकृत वितरक असल्यास त्यांनी त्यांच्या उत्पादकाच्या ISI मानकाची वैध प्रत**, तसेच मागील ३ वर्षांची आर्थिक उलाढाल दर्शविणारे प्रमाणित लेखा परिक्षण अहवाल निविदेसह सादर करावेत.

**याऐवजी**

**२.२ "गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) या पोर्टलवर उपरोक्त मानकांच्या सुतळीचे जे पुरवठादार आहेत व त्यांची सन २०२०-२१,२०२१-२२,२०२२-२३ या मागील लगतच्या ३ आर्थिक वर्षाची सरासरी उलाढाल ही किमान ३ कोटी रुपये आहे, अशा पुरवठादारांकडून बोली मागविण्यासाठी ई-निविदा प्रसिध्द करावी. निविदाकारांकडून ई-निविदा (E-Bid) प्राप्त झाल्यावर सहभागी झालेल्या ग्राह्य निविदाकारांकडून ते अधिकृत पुरवठादार असल्यास त्यांना उत्पादक कंपनीने अधिकृत वितरक नेमल्याबाबतचे प्राधिकारपत्र सादर करणे आवश्यक आहे. तसेच मागील ३ वर्षांची आर्थिक उलाढाल दर्शविणारे प्रमाणित लेखा परिक्षण अहवाल निविदेसह सादर करावेत".**
**असे वाचण्यात यावे.**

**क) परिच्छेद क्र. ७.२ मधील मुद्दा**

"उपरोक्त परिच्छेद (२) मध्ये नमुद केलेल्या मानकानुसार ISI चिन्हांकित सुतळीचा पुरवठा करणे बंधनकारक आहे".

**याऐवजी**

**"उपरोक्त परिच्छेद (२) मध्ये नमुद केलेल्या मानकांनुसार सुतळीचा पुरवठा करणे आवश्यक आहे". असे वाचण्यात यावे.**

**सदर निविदा रद्द करण्याचे अंतिम अधिकार शासनाकडे राहतील.**

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०६१४१२३१५०५९०६ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f7773ccec10687b16ba0f2d3f7f9e6f87fe68f9b1b2cb5b73b75bab952ca0621, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE91C22A99ADBAFEB91E1127B17CEF54D9C48672DC90AC9562BA7F619961CBBB, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2023.06.14 12:33:08 +05'30'

**( सतिश सुपे )**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
८) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
९) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
१०) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
११) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी

१२) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१३) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१४) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१७) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२०) वित्त विभाग ( व्यय ४), मंत्रालय, मुंबई.
२१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
२२) निवड नस्ती/नापु-१६ब.